**ग्रामीण भागातील विविध योजनेअंतर्गत होणा-या विकास कामांच्या सुसूत्रतेबाबत उपाययोजना सूचविण्यासाठी समिती गठित करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः समिती-२०२३/प्र.क्र.२२२/बांध-३

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४००००१
दिनांक: ०७ जुलै, २०२३

**प्रस्तावना:-**

राज्याच्या ग्रामीण भागातील विकास कामांसाठी विविध योजनांतर्गत निधी उपलब्ध करुन देण्यात येत असतो. सदर विकास कामांची अंमलबजावणी जिल्हा परिषद/सार्वजनिक बांधकाम विभाग/महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था इ. अशा यंत्रणामार्फत करण्यात येते. तथापि सदर विकास कामांची अंमलबजावणी वेगवेगळ्या यंत्रणामार्फत करण्यात येत असल्याने व विविध योजनांर्गत मंजूर कामांचा एकत्रित माहितीकोष (Database) उपलब्ध नसल्याने प्रशासकीय अडचणी निर्माण होतात. त्यामुळे ग्रामीण भागातील विकास योजनांच्या कार्यपध्दतीमध्ये सुसूत्रता आणून विकास कामांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने शासनास शिफारशी करण्यासाठी समिती गठित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

ग्रामीण भागातील विविध योजनांच्या अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणून विकास कामांची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने शासनास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नाव | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव | सदस्य |
| ३ | उपायुक्त ( विकास ), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर | सदस्य |
| ४ | अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे | सदस्य |
| ५ | कार्यकारी अभियंता, (बांधकाम), जिल्हा परिषद, लातूर | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, सातारा | सदस्य |

| अ.क्र. | सदस्यांचे नाव | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| ७ | कार्यकारी अभियंता (बांधकाम) मुख्यालय, जिल्हा परिषद, नाशिक | सदस्य-सचिव |

२. **समितीची कार्यकक्षा :-** समितीने खालील मुद्यांबाबत आपला अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

१) विविध योजनांतर्गत यापूर्वी झालेल्या कामांचा एकत्रित माहिती कोष (Database) तयार करणे.

२) कामांची द्विरुक्ती टाळणे, मर्यादीत संसाधनाचा योग्य वापर करणे, निर्णय प्रक्रिया अधिक प्रभावी करणे इ. करिता संगणकीय प्रणाली, रिमोट सेन्सींग, ड्रोन, आय. ओ. टी. (IOT), स्टार्टअपद्वारे विकसित तंत्रज्ञान इ. आधुनिक तंत्राचा वापर करणे.

३) विविध कामांकरिता प्रचलित सर्व संगणकीय प्रणालीचा एकीकृत वापर करून कार्यप्रणाली सुलभता ( Ease of Doing Business ) आणणे.

४) समितीला आवश्यक वाटतील अशा इतर बाबी.

३. वरील समिती सदस्याशिवाय इतर विशेषज्ञ/तज्ञांना निमंत्रित करण्याचे अधिकार समितीस राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०७१५३३३०६१२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2023.07.07 15:44:03 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२) मा. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
३) मा. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय
४) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय

५) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) विभागीय आयुक्त, महसुल विभाग (सर्व)
७) जिल्हाधिकारी (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१२) ग्रामविकास विभागातील सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी
१३) निवडनस्ती (बांध-०३)